**क्षेत्रिय स्तरावर प्रकल्पाचे बांधकाम**
**करतांना घ्यावयाची दक्षता**

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग,
**परिपत्रक**
क्रमांक - प्रकल्प २००९/(१८१/२००९)मोप्र-२
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :-२८/५/२००९

**प्रस्तावना :-** प्रकल्पाची कामे सुरु असताना संकल्पचित्रे, घळभरणीपूर्वी पूर्ण करावयाची कामे, दरवाजे निर्मिती व उभारणी, प्रकल्पावर बसवावयाची उपकरणे, गुण नियंत्रण इत्यादी संबंधी वेळोवेळी शासन परिपत्रकांव्दारे सूचना प्रस्तुत केल्या आहेत. परंतु त्याची काटेकोरपणे अंमलबजावणी व पूतर्ता होत नसल्याचे सचिव (जलसंपदा) व सचिव (लाक्षेवि) यांच्या दि. २९ व ३० एप्रिल २००९ ला काही प्रकल्पांना भेटी वेळी निदर्शनास आले आहे. या पार्श्वभूमीवर सर्व प्रकल्प (मोठे, मध्यम, लघु) बांधकामाकरीता खालील प्रमाणे सूचना देण्यात येत आहेत, त्याची काटेकोरपणे अंमलबजावणी होणे आवश्यक आहे.

१. प्रकल्पाची क्षेत्रिय स्तरावर कामे सुरु असताना संबंधीत घटक भागांची मंजूर रेखाचित्रे/संकल्पन टिप्पणी त्याअन्वये प्रत्यक्ष करावयाचे कामाची रेखाचित्रे (Working Drawing)कामाच्या प्रत्येक बाबीचे विनिर्देशके (spcifications) व कॉंक्रीटचे मिश्र संकल्पन (Mix Design), गाळणी निकष (Filter Criteria) व कामाची आवश्यक घनता (Density)याचे निकष व संपूर्ण माहिती संबंधीत शाखा अभियंता/सहायक अभियंता/उप अभियंता यांचेकडे कार्यस्थळी उपलब्ध असणे आवश्यक आहे, व त्याप्रमाणे निकषानुसार कामे पूर्ण करणे आवश्यक आहे.

२. माती व दगडी धरणांमध्ये व इतर बांधकामामध्ये वापरण्यात येणा-या साहित्यांच्या गुणनियंत्रण चाचण्या, गुणनियंत्रण मंडळांनी केलेल्या सूचनांनुसार वेळोवेळी करण्यात याव्यात,विनिर्देशकाप्रमाणे बांधकामे करुन घेण्याची प्राथमिक जबाबदारी सबंधित बांधकाम अभियंत्यांची आहे. चाचण्यांचे निष्कर्षांची नोंद विहीत नमून्यात ठेवण्यात यावी. संकल्पनानुसार बांधकाम साहित्यांचे आवश्यक गुण निकष (Design Parameters) व काम सुरु झाल्यावर प्रत्यक्ष आढळलेले गुण निकष (Observed Parameters ) यांच्या नोंदी उपलब्ध असणे आवश्यक आहे.

चाचणी निष्कर्षांमध्ये जे निष्कर्ष विहीत मर्यादेत नाहीत त्याचीही नोंद व त्यावर केलेल्या उपाययोजनांची माहिती नोंद वहीत असणे आवश्यक आहे.

३ प्रकल्पाचे घळभरणीचे काम हाती घेण्यापूर्वी शासनाने विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार खालील बाबींची पूर्तता होणे आवश्यक आहे.

१) बुडीत क्षेत्रातील जमिनीचे संपूर्ण भूसंपादन पूर्ण झालेले असणे
२) बुडीत क्षेत्रातील प्रकल्पग्रस्तांचे पुनर्वसन होऊन त्यांचे स्थलांतर पुनर्वसीत गावात झालेल असणे
३) पुनर्वसीत गावातील सर्व नागरी सुविधा पूर्ण असणे
४) प्रकल्पाचा सांडवा, Approach Channel व Tail Channel यांचे संकल्पनानुसार संपूर्ण खोदकाम झालेले असणे
५) अग्रहण विहीर, ट्रॅश रॅक, आपतकालीन दरवाजा त्याचे उच्चालक, सेवाव्दार इत्यादी सर्व कामे बोगदा खोदकामासह पूर्ण असणे

४. जलोत्सारीणीवरील/सांडव्यावरील वक्राकार दरवाजे यांची निर्मिती व उभारणी यांत्रिकी व स्थापत्य विभागाने एकत्रित नियोजन करुन, समन्वय ठेऊन नियोजित वेळेत पूर्ण करावी.

५ घळभरणीवेळी विशेष देखरेख व घळभरणीनंतर पाणीसाठा होत असतांना चोवीस तास निगराणी आवश्यक आहे.

६. माती धरण व दगडी धरणामध्ये बसविण्यात येणारी उपकरणे मध्यवर्ती संकल्पचित्र संघटनेनी दिलेल्या संकल्पनानुसार बांधकाम विभागाने बसवावयाची आहे. याकरिता महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक यांचेकडून मार्गदर्शन प्राप्त करणे व त्यानुसार उपकरणे बसविणे, उपकरणे कार्यान्वित झाल्यावर त्याची निरीक्षणे वेळोवेळी धरण सुरक्षितता संघटनेस सादर करुन निरीक्षणांची निष्कर्षे जाणून घेणे व त्यानुसार योग्य ती कारवाई करणे आवश्यक आहे.

७. प्रकल्पाचे नियोजन अत्यंत काटेकोरपणे होणे जरुरीचे आहे, यामध्ये आवश्यकतेनुसार कामांची टप्पा-१, टप्पा-२ अशी विभागणी करणे व त्यानुसार नियोजन होणे अपेक्षित आहे. कालव्याची कामे हाती घेताना सलगतेने हाती घेणे व सलग किमी मधील सर्व कामे पूर्ण होणे अत्यंत जरुरीचे असून त्यानुसार कालवे बांधकामाचे नियोजन करणे अपेक्षीत आहे. कालवे कामांचे तलांक वेळोवेळी घेणे गरजेचे असून तलांक पुस्तिका शाखा अभियंता/सहायक अभियंता यांचेकडे कार्यक्षेत्रावर असणे आवश्यक आहे.

८. धरणाचे मातीकाम करताना (Hearting & Casing) चे थरांचे काम सलगतेने करणे, असे करताना Hearting चा थर वर ठेवणे आवश्यक आहे. धरणाचे मातीकाम संपूर्ण लांबीत एकसंधपणे करणे (वेगवेगळया तलांकातील थरांत करुन नंतर एकसंध करणे टाळणे) धरणांचे बांधकाम एकजिनसी (Homogenous) करणे व आडवे जोड (Transverse Joints) राहणार नाहीत अशा प्रकारे मातीकाम करणे आवश्यक आहे.

९. धरणाचे Drains व Filters व इतर सर्व बांधकाम साहीत्याचा दर्जा Specifications नुसार असणे आवश्यक आहे. L Drains व Cross Drains चे Layout देण्यापूर्वी धरणांचे तलांकान्वये (नैसर्गिक उंचता व सखलता) L Drains व Cross Drains चे Working Plans/Drawing तयार करणे व त्याअन्वये बांधकाम करणे गरजेचे आहे. Inclind Filters व मातीकाम यांचे बांधकाम (जोड) काळजीपूर्वक करणे, Filters मध्ये माती जाणार नाही याची दक्षता मातीकामाच्या वेळी घेणे आवश्यक आहे.

१०. धरणाचे पिचिंग करताना Specifications चे अवलोकन करुन विहीत नमून्याचे, आकाराचे व वजनांचे दगड वापरुन पिचिंग करणे आवश्यक आहे.

११. सचिव (जलसंपदा) व सचिव (लाक्षेवि) यांच्या प्रकल्प भेटीत प्रकल्पाचे गुणनियंत्रण करण्याचे कार्य गुणनियंत्रण शाखेचे आहे. अशी धारणा क्षेत्रिय बांधकाम शाखेतील कर्मचा-यात व अभियंत्यात आढळली आहे. या द्वारे पुनःश्च निदर्शनास आणण्यात येते की बांधकामाचे गुण नियंत्रण करणे, दर्जेदार बांधकाम करणे, ही प्राथमिक जबाबदारी बांधकाम शाखेतील व बांधकामाचे मोजमापे नोंद करणा-या अभियंत्यांची आहे. या करीता क्षेत्रिय मुख्य अभियंता/अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी सुयोग्य सूचना त्यांचे अधिनस्त कर्मचा-- यांना व अभियंत्यांना द्याव्यात, तसेच महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक यांचे गुण नियंत्रण प्रशिक्षण वर्ग क्षेत्रिय स्तरावर आयोजित करावे व कामे विहीत Specifications नुसारच होतील याची दक्षता घ्यावी.

१२. सदर शासन परिपत्रक, महाराष्ट्र शासनाच्या www. maharashtra. gov. in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेले असून त्याचा सांकेतांक क्रमांक २००९०५२८१७३४४७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(दी.धों.भिडे)
मुख्य अभियंता (द व प्र ) व स.स.

प्रतः-

खाजगी सचिव, मा. मंत्री, जलसंपदा (म.कृ.खो.वि.म. वगळून), मंत्रालय, मुंबई-३२
खाजगी सचिव, मा. मंत्री, जलसंपदा (म.कृ.खो.वि.म.), मंत्रालय, मुंबई-३२
खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई-३२
स्विय सहाय्यक, सचिव (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई-३२
स्विय सहाय्यक, सचिव (लाक्षेवि), मंत्रालय, मुंबई-३२
सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळे
महासंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक
महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक
सर्व मुख्य अभियंता व पदसिध्द सह सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग
सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग यांनी आपल्या अंतर्गत असलेल्या कार्यकारी अभियंता यांच्या निदर्शनास आणाव्यात
सर्व तांत्रिक उप सचिव/अवर सचिव व कार्यासने
मोप्र-२ कार्यसन संग्रहार्थ